जन
वाचन
आंदोलन



जनवाचन आंदोलन हे पुस्तकांना गावागावात घेऊन जाणारे आंदोलन आहे. नवसाक्षर व अर्धशिक्षित लोकांमध्ये पुस्तकांचे सामुदायिक वाचन करणे, ते ऐकणे आणि ऐकवणे हा याचा उद्देश आहे. आज गावातल्या लोकांपर्यंत पुस्तके पोचत नाहीत. त्यांची भाषा त्यांना उमगत नाही आणि किंमती परवडत नाहीत. अशा नववाचकांपर्यंत पुस्तके पोचवण्याचे काम भारत ज्ञान विज्ञान समितीने अंगिकारले आहे. ही पुस्तके प्रसिद्ध लेखकांची आणि सोपी, सुटसुटीत व स्वस्त किंमतीत असावीत असा प्रयत्न आहे.

या आंदोलनातून काय साध्य होईल?

गावागावात जनवाचनाची व जनवाचनालयांची संस्कृती निर्माण होईल. साक्षरता आंदोलनातून हस्तगत केलेली अक्षरकौशल्ये लोक स्वत: विकसित करू शकतील. त्यांच्या ज्ञानविज्ञानाच्या कक्षा विस्तारतील. त्यांच्या सामाजिक, राजकीय आणि सांस्कृतिक जाणिवांची पातळी उंचावू शकेल. आपल्या मूलभूत हक्कांच्या आणि एकंदर परिवर्तनाच्या लढ्यासाठी जागृत होऊन ते उभे ठाकू शकतील.



देशातील लोकशाही टिकण्यासाठी आणि अर्थपूर्ण होण्यासाठी हे आवश्यक आहे. साक्षरता म्हणजे केवळ अक्षर ओळख नव्हे तर संपूर्ण जग जाणण्याचे ते कार्य आहे. या दिशेने, गावागावातील लोकांच्या खांद्याला खांदा भिडवून, आम्ही पुढे जाऊ इच्छितो.

भारत ज्ञान विज्ञान समिती
किंमत रु.२-५०

# सूर्य तुझाच आहे



भारत ज्ञान विज्ञान समिती
किंमत रु. २.५०

पुस्तकाचे नाव : सूर्य तुझाच आहे

(रशियन कथांवर आधारित)

निर्मिती सहाय्य : गणेश कांबळे

जवाआं/म: सहा

प्रकाशन : ऑक्टोबर १९९६

नववाचकांसाठी भारत ज्ञान विज्ञान समिती तर्फे राष्ट्रीय साक्षरता मिशनच्या सहकार्याने देशभर चालवल्या जात असलेल्या 'जनवाचन आंदोलन' मोहिमेसाठी प्रकाशित

**मूल्य : २ रुपये ५० पैसे**

---

प्रकाशक / मुद्रक : दत्ता देसाई
राज्य समन्वयक, भारत ज्ञान विज्ञान समिती (महाराष्ट्र),
अक्षय, २१६, केळकर रस्ता, नारायण पेठ, पुणे ४११०३०
फोन : ४५६६९४
मुद्रण स्थळ : बालोद्यान प्रेस, पुणे ३०

---

अक्षर जुळणी / मांडणी : दिनानाथ मनोहर

# कणीस

कोण एके काळची गोष्ट. एका छोट्या टेकडीच्या कुशीत एक छोटे गाव होतं. गावाच्या कडेला एक घर होतं. त्या घरात दोन उंदीर रहात होते. एकाचं नाव होतं लचक्या आणि दुसऱ्याचं मुरक्या. त्याच घरात एक डौलदार कोंबडा रहात होता. त्याचं नाव सोनकंठ्या. तिघंही बऱ्याच काळापासून तिथे रहात होते.

लचक्या आणि मुरक्या सदानकदा नाचायचे आणि गायचे. लचकत, मुरडत बागडत राहायचे. कसलंही काम म्हटलं की त्यांच्या अंगावर काटा उभा रहायचा. कामाचे नाव काढलं की ते पळून जायचे. तसं पाहिलं तर सोनकंठ्यादेखील गायचा, मजेत इकडे तिकडे फिरायचा. पण कामावरही जायचा. दाणे टिपायचा आणि किडे उचलायचा, भूक लागली की ते मटकवायचा. अधे-मधे थांबून बांग द्यायचा. आपलं काम तो अशा तऱ्हेने मोठ्या मजेत करायचा.

एकदा सकाळी सोनकंठ्या नेहमीप्रमाणे अंगण झाडत होता. झाडता झाडता तो कुंपणाकडेला पोचला. तिथं जमिनीवर त्याला एक मक्याचे कणीस सापडलं. सोनकंठ्या खूष झाला.

" अरे लचक्या, मुरक्या" त्याने साद घातली, " हे बघा मला काय सापडलयं!"

उंदीर डोळे चोळत चोळत उठले. धावत त्याच्याजवळ गेले. ते कणीस निरखून पहात म्हणाले, "छान, पण ते झोडपलं

पाहिजे.''



''चला झोडपू'' सोनकंठ्या म्हणाला.

दोघे उंदीर एकमेकाकडे टकामका बघत गप्प राहिले. जागचे हलेचनात.

एक क्षणभर थांबून सोनकंठ्यानं विचारलं, ''कोण झोडपणार?''

''मी नाही'' लचक्या म्हणाला.

'' मी पण नाही'' मुरक्या म्हणाला.

'' मग मीच करतो हे काम'' सोनकंठ्या म्हणाला. काठी घेऊन तो कामाला लागला. कणीस झोडपून दाणे वेगळे करू लागला.



लचक्या मुरक्या तिथून पळाले. विटी आणि दांडू घेऊन खेळू लागले.

कोंबड्यानं झोडपणी संपवली. मक्याच्या दाण्यांचा सोनेरी छोटा ढीग केला आणि पुन्हा साद घातली,

''अरे लचक्या, अरे मुरक्या. इकडं या. बघा हे धान्य झालंच झोडपून!''

उंदीर धावत धावत गेले आणि म्हणाले, ''आहा ! किती छान!''

मग दोघेही एका सूरात कुचकुचले, '' हे आता गिरणीत नेलं पाहिजे आणि दळून पीठ आणलं पाहिजे!''

''कोण घेऊन जाईल?'' सोनकंठ्यानं विचारलं.

''मी नाही!'' मुरक्या ओरडला.

'' मी पण नाही'' लचक्या त्याहून जोरात ओरडला.

'' ठीक आहे. मीच जाईन गिरणीत'' सोनकंठ्या म्हणाला.

मका त्याने पिशवीत भरला. पिशवी खांद्यावर मारली. आणि तो गिरणीच्या दिशेने निघाला. हिरव्या गवतातल्या पायवाटेवरून तो चालू लागला.

तो गेला तेव्हा लचक्या मुरक्या बेडूकउड्या खेळत होते.

एकमेकांच्या अंगावर उड्या मारत होते. अंगणातल्या मऊशार हिरव्यागार गवतावर लोळण घेत होते आणि खिदळत होते.

थोड्या वेळानं कोंबडा गिरणीतून परत आला. पीठाची पिशवी त्यानं खाली ठेवली. पंख फडफडवून त्यानं त्यावरचे पीठ झट-कलं. आणि क्षणभर दम खाऊन हाक मारली,

''अरे लचक्या, इकडं ये! अरे मुरक्या, इकडं ये! हे बघा पीठ आणलयं.''

लचक्या मुरक्या पळत पळत घरात आले. ताज्या, दळ-लेल्या पीठाचा वास त्यांनी नाकात भरून घेतला. आणि कोंब-ड्याचे कौतुक करत ते म्हणाले,

''किती शहाणा सोनकंठ्या! किती हुशार आहेस रे तू! आता हे पीठ मळून त्याच्या मस्त भाकऱ्या भाजल्या पाहिजेत.!''

''पीठ कोण मळणार?'' सोनकंठ्यानं विचारलं.

''मी नाही'' लचक्या म्हणाला.

'' मीपण नाही'' मुरक्या कुचकुचला.

ते ऐकून कोंबड्याला खूप राग आला. त्याला वाटलं दोघां-वर खूप ओरडावं. त्यांच्या आळशीपणाबद्दल शिव्या द्याव्यात. ऐतखाऊपणाबद्दल खरडपट्टी काढावी. पण तो काहीच बोलला नाही.



त्याने राग आवरला. थोडा वेळ विचार केला. मनाशी काही-तरी ठरवलं. त्याने मान हलवली. त्याचा लालचुटूक तुरा डोलला. मग तो शांतपणे म्हणाला,'' आता हेही काम मलाच करायला पाहिजे.''

त्यानं परात काढली. पीठ ओतले व पाणी घालून ते काल-वलं. सरपण आणून चूल पेटवली. चुलीवर तवा चढवला. तवा गरम झाल्यावर त्याने भाकऱ्या थापायला घेतल्या.

इकडे उंदीरही वेळ फुकट घालवत नव्हते! त्यांचे हुंदडणे चालू होते. जमिनीवरून खांबावर. खांबावरून छपरात. छपरा-वरून भिंतीवर. आणि भिंतीवरून पुन्हा जमिनीवर अशी त्यांची पळापळ सुरू होती. मोठ्या कसोशीनें ते शिवाशिवी खेळत होते. मध्येच कुचकुचत होते. उलटसुलट उड्या मारत होते.

एकेक भाकरी तव्यावरून विस्तवावर येऊ लागली. पुरीसा-रखी टम्म फुगू लागली. खरपूस भाजलेल्या भाकऱ्यांचा खमंग वास घरभर दरवळू लागला. बघता बघता पौर्णिमेच्या चंद्रा-सारख्या तीन गोल भाकऱ्या तयार झाल्या.

इकडे त्या खमंग वासानं लचक्या मुरक्याचा जीव खालीवर होऊ लागला. इतका वेळ वरखाली करणारे ते उंदीर धप्पकन उडी मारून जमिनीवर आले. यावेळी हाक मारायची वाटही न पाहता थेट चुलीजवळ गेले.

'' ओहोहो, काय वास सुटलाय'' लचक्या मिशा फिस्कारत

म्हणाला.

" अहाहा, काय भाकऱ्या जमल्यात मस्त" मुरक्या दात



विचकत म्हणाला.

"काय कडकडून भूक लागलीय नाही?" लचक्या पुढे सरकत म्हणाला.

" केव्हा एकदा जेवायला बसतो असं झालयं मला" मुरक्या जिभल्या चाटत म्हणाला.

दोन ताटं घेऊन दोघांनी जमिनीवर पटकन बसकण घातली. आणि ते ताटात भाकरी पडण्याची वाट पाहू लागले.

तिन्ही भाकऱ्या चुलीजवळून उचलून सोनकंठ्याने नीट बाजूला



ठेवल्या. आणि घसा साफ करुन तो म्हणाला, " एक मिनिट थांबा. आधी मला सांगा, कणीस कुणाला सापडलं?"

"तुला सापडलं" दोघेही उंदीर ओरडले.

"आणि ते कुणी झोडपलं?" कोंबड्याने विचारलं.

"तू झोडपलंस. " लचक्या मुरक्या जरा खालच्या आवाजात म्हणाले.

"आणि धान्य गिरणीत घेऊन कोण गेलं?" कोंबड्यानं पुन्हा शांतपणे विचारलं.

"तूच" लचक्या मुरक्याचा आवाज पार खाली आला.

" आणि पीठ कुणी मळलं? सरपण कुणी आणलं? चूल कुणी पेटवली? भाकऱ्या कुणी भाजल्या?" सोनकंठ्याने विचारलं.

" हे सगळं तू केलेस! फक्त तू!" उंदीर चाचरत चाचरत कुजबुजले.

"आणि तुम्ही काय केलंत?" सोनकंठ्यानं जोरात विचारलं.

ते काय बोलणार? बोलायला त्यांच्यापाशी तोंड तरी होते का? लचक्या आणि मुरक्या मुकाट्याने उठले. पडलेल्या चेहऱ्याने बाहेर पडले.

सोनकंठ्या थोडा वेळ तसाच बसून राहिला. त्यानं विचार केला. घडली एवढी अद्दल पुरेशी आहे. रिकामटेकड्या आणि ऐतखाऊंना या घरात यापुढे काही मिळणार नाही असे लचक्या मुरक्याला खडसावून सांगायचं त्यानं ठरवलं. आता शेवटची फक्त एक संधी द्यावी असा त्यानं मनाशी विचार केला..

आणि पुन्हा त्यानं साद घातली,'' ए लचक्या.. एक मुरक्या..''

(आधारित)



## सूर्य तुझाच आहे!

''हुश्श! आलो बुवा एकदाचा या जगात!'' अंड्याच्या कवचामधून डोके बाहेर काढत कोंबडीचे पिलू चिवचिवले. ''अरेच्या! बाहेर एवढा उजेड का?''



त्याने एकदा एकीकडे पाहिले, मग दुसरीकडे पाहिले आणि त्याची नजर वर गेली. सूर्याच्या तेजस्वी किरणांनी त्याचे डोळे किलकिले झाले.

''अच्छा! तुझ्यामुळे हा एवढा उजेड पडलाय,'' सूर्याला उद्देशून पिल्लू बारक्या आवाजात कुचकुचले. '' तू कसा छान



चकचकीत आणि माझ्यासारखाच पिवळा आहेस. फक्त तू तिथं वर कुठंतरी आहेस आणि मी खाली आहे एवढाच फरक! म्हणजे तू माझ्याआधी जन्मला असावास. नाहीतर एवढं उंच चढून जायला तुला वेळ कसा मिळाला असता?''

पण सूर्याने त्याला काहीही उत्तर दिले नाही. तो नुसता त्याच्याकडे पाहून हसला. कोंबडीचे पिल्लू धडपडत अंड्यातून बाहेर पडले. आपल्या काटकुळ्या तंगड्यांवर उड्या मारीतजवळच्या उबदार गवतावर गेले.

एकाएकी त्याच्या नजरेला एक छोटेसे तपकिरी घर दिसले. त्या घराला मधोमध एक वाटोळे भोक होते. त्या घरातून कुणाचा तरी घोरण्याचा आवाज येत होता.

पिल्लाने आपल्या इवल्याशा चोचीने त्या घराच्या एका बाजूला ठोठावले.

''कू..ए..ए..कू ! कुणी आत आहे का? '' त्याने हाक घातली.

कुणीच उत्तर दिले नाही.

''अरे मला उत्तर दे ना! '' पिल्लू पुन्हा ओरडले.

कुणाची तरी चिडकी गुरगुर घरातून ऐकू आली. एका कुत्र्याच्या पिल्लाचे केसाळ मुंडके त्या भोकातून बाहेर डोकावले.

"कोण आहेस तू?" कोंबडीच्या पिल्लाने विचारले.

कुत्र्याच्या पिल्लाने झोपाळू नजरेने त्याच्याकडे पाहिले.

" मी या कुत्र्याच्या घराचा मालक आहे. हे घर माझं आहे," कुत्र्याचे पिल्लू म्हणाले.

कोंबडीच्या पिल्लाने गपकन् डोळे मिटले आणि पुन्हा उघडले. "तू..अं..अं.... मालक...या...या घराचा?"

"होय," जांभई देत कुत्र्याचे पिल्लू म्हणाले.

कोंबडीच्या पिल्लाने त्याला एकदा सावकाश न्याहाळले.

"चल आपण खेळ खेळू या" ते म्हणाले.

"तुझ्याजवळ खेळायला काय आहे?"

" न्..न.. नाही" कोंबडीचं पिल्लू चाचरत म्हणाले.

"नाही? मग काय गंमत?"

" आपण खूप गंमत करू, तू चिंता करू नको. बघ मी काय करतो?"

आणि कोंबडीच्या पिल्लाने खूप वेळा टणाटणा उड्या मारून दाखवल्या.

पण कुत्र्याच्या पिल्लाने पुन्हा एकदा जोरदार जांभई दिली



आणि ते घरात गुडूप झाले. कोंबडीच्या पिल्लाने खूप विचार केला.

"अरेच्चा! मी माझ्या अंड्याच्या कवचाला विसरलोच !" ते ओरडले. "अरे ए, चल बाहेर ये आणि माझं कवच बघ!"

कुत्र्याच्या पिल्लाने एकदा नापंसतीने गुरगुर केली. ते घराबाहेर आले. "यापेक्षा दुसरं काही चांगलं मला दाखवायचं तुला सुचलं नाही का?" त्याने विचारले. "ह्यॅ! तुझं हे भिकार जुनाट कवच मी एक फटक्यात फोडून टाकीन! हे बघ - हे अस्सं! बघ, त्याचा कसा भुगा झाला!" असे म्हणत त्याने त्या कवचावर पाय आपटून त्याचा चुरा केला. कोंबडीच्या पिल्लाला खूप वाईट वाटले.



"कवचाशिवाय माझ्याकडं आणखी खूप खूप गोष्टी आहेत" ते म्हणाले, "माझ्याकडं.... माझ्याकडं..."

त्याच्याभोवती कितीतरी खजिना पसरला होता. हिरवेगार गवत, रंगीबेरंगी फुलपाखरे, सूर्याची हसरी किरणे, चमचमणारी उबदार पाण्याची डबकी!

"माझ्याकडं... तो आहे!" सूर्याला दाखवीत कोंबडीचे पिल्लू

उद्गारले.

कुत्र्याचे पिल्लू मनापासून हंसले, ते म्हणाले, ''काय? सूर्य? मूर्ख आहेस! सूर्य कुणाचाच नाही.''

.''कुणाचाच नाही?'' कोंबडीच्या पिल्लाने विचारले.

''नाही''

''पण.. पण .. मला सांग.. हे घर कोणाचं?''

''माझं''

''तुझं?''

''हो''.

''आणि सूर्य कुणाचा?'' कोंबडीच्या पिल्लाने प्रश्न केला.

''कुणाचाच नाही'' कुत्र्याचे पिल्लू उद्गारले.

''कुणाचाच नाही? मग असं असेल तर मी त्याला माझ्यासाठी घेईन.'' आणि असे म्हणून कोंबडीचे पिल्लू ऐटीत पावले टाकीत डबक्याकडे निघाले. डबक्यात सूर्याचं प्रतिबिंब चमकत होतं.

'' थांब थांब!'' सावध होत कुत्र्याचे पिल्लू ओरडले, ''तू सूर्य घेणार म्हणजे काय?''



कोंबडीचे पिल्लू थांबले. त्याने कुत्र्याच्या पिल्लाला विचारले,

'' तुला घर आहे, होय की नाही?''

''अं.. हो''

''ते तुझं आहे. होय की नाही?''

''होय''

''मग सूर्य माझा होईल.''

''ए, एक मिनिट थांब. हे बघ, मी जर माझं अर्धं घर तुला दिलं... तर तू सूर्य तुला एकट्याला घेणार नाहीस ना? घेशील का?'' कुत्र्याच्या पिल्लाने विचारले.

''तुझं अर्धं घर? कशाला? ते घेऊन मी काय करू?''

'' म्हणजे? तुला माहीत नाही?'' कुत्र्याच्या पिल्लाने आश्चर्याने विचारले, ''तू तुझ्या अर्ध्या घरात राहशील आणि मी माझ्या अर्ध्या घरात राहीन.''

''ठीक आहे,'' कोंबडीच्या पिल्लाने कबुली दिली.

आपल्या शेपटीला आनंदाने एक झटका देऊन कुत्र्याच्या पिल्लाने घरात सूर मारला. एक नवी कोरी करवत बाहेर काढली. करवतीची करकर चालू झाली. जमिनीवर लाकडाचा भुस्सा पसरला. कुत्र्याचे घर सजीव वस्तूसारखे थरथरले आणि एकदम

त्याचे बरोब्बर दोन तुकडे झाले. त्या दोन तुकड्यांच्या मधोमध कुत्र्याचे पिल्लू बसले आणि आपल्या करामतीवर खूष होऊन हसले. त्याच्या अंगभर लाकडाचा भुस्सा चिकटला होता. थोडा भुस्सा त्याच्या जिभेवर चिकटला होता.

कोंबडीचे पिल्लू धावत त्याच्याकडे गेले आणि त्याने फुंकर घालताच भुस्सा उडाला. दोघांच्याही नाकांमध्ये गुद्गुल्या झाल्या व दोघेही जोरात शिंकले.

" बघ! सारं काम पार पाडलं" कुत्र्याचे पिलू म्हणाले, "आता आपल्याला प्रत्येकाला स्वत:चं घर आहे. चल आत जाऊ या."

ती दोघं आपापल्या घरात गेली आणि कुत्र्याचं पिल्लू आपल्या पुढील पंजांवर डोके टेकून विसावले.

"काय मस्त आयडिया केली. होय की नाही?" त्याने विचारले.

"होय, मलाही तसं वाटतं" थरथर कापत एका कोपऱ्यात लपण्याचा प्रयत्न करत कोंबडीचे पिल्लू म्हणाले, कारण एकाएकी हवा थंड झाली होती व काही केल्या त्याला अंगात ऊब आणता येत नव्हती.

सूर्य ढगामागे लपला आणि त्याच्याभोवतालचे सारे काळे-कुट्ट व कुरूप दिसू लागले. गार वारा वाहू लागला आणि





पावसाचे थेंब जमिनीवर कोसळू लागले.

" ए कोंब-डीच्या पिल्ला!" कुत्र्याच्या पिल्लाने हाक मारली.

"काय?" कोंब-डीचे पिल्लू अगदी बारीक आवाजात ओरडले.

" आपण दोघे एकमेकांच्या घरांना भेट देऊ या."

"चालेल. पण पहिल्यांदा कोण कोणाला भेटणार?"

"तू येऊन मला भेट" कुत्र्याचं पिल्लू म्हणाले.

"ठीक आहे!" कोंबडीच्या पिल्लाने पावसात उडी मारली व ते कुत्र्याच्या पिल्लाला भेटायला धावले. पण कुत्र्याच्या पिल्लाच्या घरातही त्याच्या घरासारखीच थंडी वाजत होती आणि मजा येत नव्हती. ती दोघंही एकमेकांना घट्ट बिलगून बसली आणि गप्प राहून काळयाकुट्ट डबक्यांकडे एकटक पाहू लागली. थंडीमुळे कुत्र्याचे पिल्लू मोठमोठ्यांदा उचक्या देऊ लागले.

"आपण असं करू या?" कोंबडीचं पिल्लू म्हणाले.

"काय?" कुत्र्याच्या पिल्लाने विचारले व पुन्हा जोरात उचकी

दिली.

"आपण माझं अर्ध घर तुझ्या घराला जोडू या का?" मग आपल्याला सबंध घर होईल आणि आपण त्यात दोघं एकत्र राहू!"

कोंबडीचे पिल्लू हसले आणि त्याबरोबर कुत्र्याचे पिल्लूही हसू लागले. त्यांना एवढा आनंद झाला होता की काही विचारू नका. ती दोघे सारखी हसत सुटली. तेवढ्यात सूर्य पुन्हा आकाशात चमकू लागला. तो ढगामागून बाहेर आला. त्याने पावसाचे थेंब झटकून टाकले. जमिनीवरील त्या छोट्या तपकिरी घरकुलामधून त्याच्याकडे टक लावून पाहणाऱ्या चकचकीत डोळ्यांच्या दोन जोड्या त्याने पाहिल्या. त्या घरावरून जाताना सूर्य खूप खाली झुकला. त्या दोन मित्रांकडे पाहून त्याने मान डोलावली व जंगलापलिकडे तो दिसेनासा झाला.



" तो बघ! तो परत नाहीसा झाला" मावळणाऱ्या सूर्याकडे पहात कोंबडीचे पिल्लू दु:खाने म्हणाले.

" पण तो काही कायमचा नाही गेला" कुत्र्याच्या पिल्लाने धीर देत म्हटले," तो आपल्याला रोज भेटायला येईल. आता तो आपल्या दोघांचा झालाय, तुझा आणि माझा!"

